राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१५ व २०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ संवर्गासाठी १० व महाराष्ट्र विकास सेवा गट-ब संवर्गासाठी साठी १ अशी एकूण ११ अधिसंख्य पदे दोन वर्षासाठी निर्माण करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः मविसे १०/२०१७/प्र.क्र.६०/आस्था-३(अ),**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई ४००००१

तारीख : ३१ ऑगस्ट २०१७

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभागाचे शासन निर्णय क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.१.२०१४

२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.टिआरएन-२०१७/प्र.क्र.३८/सीपीटीपी-अ दि.१९.७.२०१७

३) वित्त विभाग,शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१/दिनांक २०.२.२०१६

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील उमेदवारांकरिता एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्या अनुषंगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१५ व २०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ संवर्गातील उपमुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी आणि महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील सहाय्यक गट विकास अधिकारी या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र विकाससेवा,गट-अ संवर्गातील उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी उमेदवारांकरीता १० अधिसंख्य पदे रु.१५६००-३९१००, ग्रेड वेतन रु.५४००/- या वेतनश्रेणीत आणि महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील सहाय्यक गट विकास अधिकारी उमेदवारांकरिता १ अधिसंख्य पद रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु. ४४००/- या वेतनश्रेणीत अशी एकूण ११ अधिसंख्य पदे दिनांक १.८.२०१७ पासून दोन वर्षांच्या कालावधीकरीता निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देत आहे.

२. सदर ११ अधिसंख्य पदे ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब संवर्गातील ११ अधिसंख्य पदांवरील दिनांक १.८.२०१७ ते ३१.७.२०१९ या कालावधीतील वेतनावर येणारा खर्च सन २०१७-२०१८ व सन २०१८-२०१९ या वर्षीच्या मंजूर अनुदानामधून "२०५३- जिल्हा प्रशासन, ०९३- जिल्हा आस्थापना (३) प्रकल्प गट मुख्यालय, गट विकास अधिकारी (राज्यक्षेत्र) (२०५३०७०७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१ दिनांक २०.२.२०१६ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११३३२२९०४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Natha Savane

Digitally signed by Rajendra Natha Savane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, cn=Rajendra Natha Savane
Date: 2017.08.31 16:14:19 +05'30'

**(रा.ना.सवने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
२) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०००२०
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०००२०
४) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
५) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
६) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७) संचालक, वनामती, धरमपेठ अमरावती रोड, नागपूर-१०
८) सर्व विभागीय आयुक्त.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१०) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
११) सर्व कोषागार अधिकारी,
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.

१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर.

१४) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) कार्यासन क्र.वित्त-१, वित्त-९, ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.

१६) निवडनस्ती.